**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी उर्जा बचतीसाठी एलईडी पथदिवे बसविण्याकरिता ईईएसएलसोबत करारनामा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१८३/नवि-२०**
**मंत्रालय, मुंबई ३२**
**दिनांक:- ०४ जून, २०१८**

**संदर्भ :-**

(१) शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग क्रमांक अपाऊ-२०१५/ प्र.क्र. ३७८/ उर्जा-७, दिनांक २२ जून, २०१७
(२) शासन निर्णय नगरविकास विभाग क्रमांक संकीर्ण- २०१७/ प्र.क्र.१८३/नवि-२०, दिनांक १२ जानेवारी, २०१८

**प्रस्तावना**

राज्य शासनाचे उर्जा संवर्धन धोरण उपरोक्त दिनांक २२ जून, २०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित केले आहे. या धोरणानुसार पथदिवे बसविताना फक्त एलईडी पथदिवे बसविणे बंधनकारक केले आहे. तसेच, सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रात ईईएसएलच्या माध्यमातून एस्को तत्वावर एलईडी पथदिवे बसविण्यासाठी राज्य शासनाने करारनामा केला आहे. त्याअनुषंगाने पुढील अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

राज्य शासनाच्या उर्जा विभागाच्या, उर्जा संवर्धन धोरण, २०१७ नुसार सर्व नागरी स्वराज्य संस्थांना पथदिवे बसविताना फक्त एलईडी पथदिवे बसविणे बंधनकारक केले आहे. हे धोरण नगर विकास विभागाच्या वतीने स्वीकृत करून राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना लागू करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. त्या अुनषंगाने सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रात केंद्रशासनाच्या सार्वजनिक उपक्रम असलेल्या एनर्जी एफिशिएन्सी सर्विसेस लिमिटेड म्हणजेच ईईएसएलच्या माध्यमातून एस्को तत्वावर एलईडी पथदिवे बसविण्यासाठी राज्य शासनाने ईईएसएलसोबत करारनामा केला आहे. त्यासमवेतच संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रात ईईएसएलच्या माध्यमातून एलईडी पथदिवे बसविण्यासाठी करावयाच्या करारनाम्याचा मसूदा देखिल विहित केलेला आहे. या करारनाम्याच्या प्रती सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना स्वतंत्रपणे पाठविल्या आहेत. **राज्यशासनाच्या सदर निर्णयास अनुसरून सर्व नागरी स्वराज्य संस्थानी पथदिव्यांसाठी फक्त एलईडी दिवे बसविणे व त्यासाठी ईईएसएलसोबत करारनामा करणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.**

२. या पार्श्वभूमीवर ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना यापूर्वी पथदिव्यांसाठी एलईडी दिवे बसविण्यासाठी वैशिष्ट्यपूर्ण योजना किंवा अन्य योजनेतून राज्य शासनाने निधी मंजूर करण्यात केला असेल, मात्र, दिनांक १२.०१.२०१८ पर्यंत कार्यादेश देण्यात आले नसतील अशा निधीतून या एलईडी

दिवे बसविण्याच्या प्रयोजनासाठी त्यापुढे कोणताही खर्च करण्यात येऊ नये, अशा सूचना समक्रमाकाच्या दिनांक १२.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. अशा निधीतून हाती घ्यावयाच्या सुधारीत कामांचा प्रस्ताव शासनाकडे सादर करण्यात यावा व त्यावरील शासनाच्या निर्णयांनतरच पुढील कार्यवाही करण्यात यावी. सदर सूचनांचा पुनरूच्चार करण्यात येत आहे.

३. ईईएसएलच्या माध्यमातून एस्को तत्वावर एलईडी पथदिवे बसविताना नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस **सुरवातीला कोणतीही भांडवली गुंतवणूक करावी लागणार नाही**. त्यामुळे, एलडी पथदिवे बसविण्यासाठी शासनाच्या निधीसोबतच, १४ व्या वित्त आयोगाच्या निधीतून किंवा स्वनिधितून देखिल **कोणताही भांडवली खर्च करण्यास प्रतिबंध राहील**.

४. राज्य शासनाच्या उपरोक्त निर्णयानुसार राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी रस्त्यांवरील प्रकाश व्यवस्थेकरीता (पथदिवे) एलईडी दिव्यांचा वापर करून उर्जा संवर्धन करण्यासाठी ईईएसएल (EESL) या केंद्रशासनाच्या सार्वजनिक उपक्रमाशी करारनामा (MoU) करण्याची कार्यवाही दिनांक ३० जून, २०१८ पर्यंत पूर्ण करावी. महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ च्या कलम ७७ (अअ) नुसार राज्य शासनाच्या या धोरणात्मक निर्णयाची कालबध्द अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित मुख्याधिकारी यांच्यावर आहे. त्यानुसार राज्यातील सर्व नगरपरिषदा/नगरपंचायतींनी पथदिव्यांसाठी फक्त एलईडी दिवे बसवणे व त्यासाठी ईईएसएल (EESL) सोबत दिनांक ३० जून, २०१८ पूर्वी करारनामा करणे, संबंधित मुख्याधिकारी यांच्यावर बंधनकारक आहे.

**५. राज्यशासनाने** ईईएसएल सोबत केलेल्या करारनाम्याच्या अनुषंगाने संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांशी (महानगरपालिका/नगरपरिषदा/नगरपंचायती) समन्वय साधून पुढील कार्यवाही करण्यासाठी **आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांची राज्य शासनाच्या वतीने समन्वयक** म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

६. यानुसार संबंधित शहरांशी करारनामा करण्याचे काम ईईएसएलने यापूर्वीच सूरू केली आहे. ईईएसएलने विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांशी करारनामा करून एलईडी दिवे बसविण्याची कार्यवाही टप्याटप्प्याने डिसेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण करावी.

७. ईईएसएलसोबत करण्यात येणाऱ्या करानाम्यानुसार ॲन्युयिटीच्या खर्चाचा परतावा करण्यासाठी प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय एस्क्रो अकाऊंट उघडण्यात येणार आहे. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था त्यांच्याशी संबंधित ॲन्युयिटीच्या खर्चाचा परतावा या एस्क्रो अकाऊंटमध्ये स्वउत्पन्नातून नियमितपणे भरावा. त्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांना मिळणाऱ्या १४ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाचा किंवा महानगरपालिकांना वस्तू व सेवा कराच्या भरपाई अनुदानाचा वापर करता येईल. त्याचप्रमाणे, करारनाम्यातील तरतूदीनुसार कोणत्याही नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने ईईएसएलसोबत केलेल्या करारनाम्यानुसार देय अन्युईटीचा परतावा ईईएसएलला एस्क्रो अकाऊंट द्वारे प्रदान करण्यात कुचराई केल्यास (Defaulted) अशी देय रक्कम संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस देय असलेल्या सर्व प्रकारच्या अनुदानातून कपात करून ईईएसएलला वळती करण्यात येईल.

८. सदर योजना अधिक किफायतशीर (Cost effective) व्हावी यासाठी, राज्य शासनाच्या उर्जा संवर्धन धोरणातील (परिच्छेद ३.१) पथदिव्यांमध्ये उर्जा बचतीचे प्रकल्प राबविण्यासाठी महाउर्जाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कमाल रूपये ५० लक्ष पर्यंतचे देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्याची रक्कम उपरोक्त उल्लेखित एस्क्रो अकाऊंटमध्येच जमा करण्यात यावी.

९. यानुसार एलईडी दिव्यांसाठी ईईएसएल सोबत करारनामा करणे व ईईएसएलच्या माध्यमातून उर्जाबचत उपक्रम राबविण्याची व या शासन निर्णयातील सर्व अनुषंगिक बाबींची कोटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित महानगरपालिका आयुक्त/ मुख्याधिकारी, नगरपरिषद/नगरपंचायत यांची राहील.

१०. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०४१५१६१६२०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.06.04 15:18:26 +05'30'

**(पां. जो. जाधव)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१) महालेखापाल महाराष्ट्र-१, मुंबई.
२) मा.महालेखापाल महाराष्ट्र-२, नागपूर.
३) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री/ राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
६) मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७) सर्व सन्माननीय संसद सदस्य/ विधानसभा/विधानपरिषद सदस्य
८) मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (उर्जा), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई

१७) व्यवस्थापकीय संचालक, एनर्जी एफिशिएन्सी सर्व्हिसेस लिमिटेड, नवी दिल्ली
१८) प्रादेशिक व्यवस्थापक,एनर्जी एफिशिएन्सी सर्व्हिसेस लिमिटेड,मुंबई
१९) महासंचालक, मेडा, पुणे
२०) उपसंचालक (उर्जा संवर्धन), मेडा, पुणे
२१) सर्व विभागीय आयुक्त
२२) सर्व जिल्हाधिकारी
२३) आयुक्त, सर्व महानगरपालिक
२४) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा
२५) मुख्याधिकारी, सर्व नगरपंचायती
२६) कार्यासन नवि-३३ / कार्यासन नवि-१६ / कार्यासन नवि-०४ नगर विकास विभाग
२७) निवडनस्ती, (नवि-२०)

*****